**राज्यातील विविध जिल्ह्यातील १० गावांमध्ये मधाचे गाव योजना राबविण्यासाठी अंदाजपत्रकास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक :- केव्हीबी-२०२४/प्र.क्र.६४/उद्योग-६.**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ३० एप्रिल, २०२५.

**वाचा :** १) उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, शासन निर्णय क्र. केव्हीबी-२०२३/प्र.क्र.४९/उद्योग-६ दि.२०/०२/२०२४.

२) महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ यांचे पत्र क्र.कार्या-४/उद्योग/मधाचे गांव/२०२४/४०१३, दि.२७/०१/२०२५.

**प्रस्तावना:-**

राज्यातील भौगोलिक परिस्थितीनुसार नैसर्गिक साधन सपंत्ती व मुबलक फुलोरा असणा-या भागात मधमाशा संवर्धनातून निसर्गाचे संरक्षण होण्याच्या दृष्टीने तसेच मध आणि मधामाशांपासून तयार होणारी उत्पादने यांची साखळी प्रक्रिया व विक्री व्यवस्था करणे, या माध्यमातून मधुपर्यटन करणे याकरीता "मधाचे गाव" ही योजना राबविण्यास संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे.

त्याअनुषंगाने जिल्हाधिकारी तथा अध्यक्ष, संनियंत्रण समिती यांनी शिफारस केलेल्या आणि मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ यांनी निश्चित केलेल्या १० गावांमध्ये 'मधाचे गाव' योजना राबविण्यासाठी करावयाच्या खर्चाचे अंदाजपत्रकास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ यांनी सादर केलेल्या प्रस्तावानुसार (१)घोलवड, ता.डहाणु जि.पालघर, (२)भंडारवाडी, ता.किनवट, जि.नांदेड (३)बोरझर, ता.नवापुर, जि.नंदुरबार (४)काकडदाभा, ता.औढ़ानागनाथ, जि.हिंगोली (५)चाकोरे, ता.त्र्यंबकेश्वर, जि.नाशिक (६)उडदावणे, ता.अकोले, जि.अहिल्यानगर (७)शेलमोहा, ता.गंगाखेड, जि.परभणी (८)सिंधीविहीर, ता.कारंजा, जि.वर्धा (९)सालोशी, ता.महाबळेश्वर, जि.सातारा (१०)आमझरी, ता.अमरावती, जि.अमरावती या १० गांवात **मधाचे गाव** ही योजना राबविण्यासाठी एकूण रु.५,०१,९७,०००/- (अक्षरी रुपये पाच कोटी, एक लाख, सत्याण्णव हजार मात्र) इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकास खालील अटींच्या अधिन राहून प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

i. योजना कार्यान्वित झाल्यानंतर पुढील वर्षासाठी योजना कार्यान्वीत रहावी याची संपूर्ण जबाबदारी संबंधित गावावर राहील, याबाबतचे हमीपत्र संबंधित ग्रामपंचायतीकडून घेण्यात यावे.
ii. ज्या गावांमध्ये शासनाने मंजूर केलेल्या निधीपेक्षा जास्त खर्चाची आवश्यकता भासेल, तो खर्च अन्य योजनेअंतर्गत असलेल्या निधीमधून उपलब्ध करुन देण्याची मुभा जिल्हाधिका-यांना राहील.
iii. सदर निधी खर्च करतांना शासनाच्या प्रचलित नियमांचे पालन करावे.
iv. या कामासाठी मनुष्यबळाची नियुक्ती करतांना यासंदर्भात शासनाने वेळेवेळी निर्गमित केलेले शासन निर्णय व सूचनांचे पालन करण्यात यावे.
v. याअंतर्गत आवश्यक खरेदी करतांना व सेवा प्राप्त करुन घेतांना या विभागाच्या दि.०१/१२/२०१६ च्या शासन निर्णयान्वये निर्गमित शासकीय विभागाने करावयाच्या कार्यालयीन खरेदीच्या कार्यपद्धतीची नियमपुस्तिकेमधील तरतूदींचे पालन करण्यात यावे.
vi. इमारत दुरुस्ती व तत्सम कामांना रितसर सक्षम प्राधिका-यांकडून तांत्रिक व प्रशासकीय मान्यता घेण्यात यावी.
vii. प्रस्तावित खर्च प्रस्तावातील बाबींवरच होईल याची दक्षता घ्यावी.
viii. सदर खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र विहित वेळेत शासनास सादर करावे.

ix. जनजागृती शिबीर, मेळावे, प्रशिक्षण कार्यक्रम, सेवानिवृत्त/हंगामी कर्मचा-यांची नियुक्ती इत्यादी बाबींच्या मान्यतेच्या व आदेशांच्या प्रती उपयोगिता प्रमाणपत्रासोबत सादर कराव्यात.

x. मधाचे गाव योजनेंतर्गत मध पेट्यांकरिता लागणारी १० % रक्कम लाभार्थ्यांकडून उपलब्ध होईल याबाबत मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ यांनी दक्षता घ्यावी.

**२.** वरीलप्रमाणे नमुद १० गावांसाठी गावनिहाय मंजूर निधीची रक्कम ही सोबतच्या परिशिष्टाप्रमाणे राहील.

**३.** यावरील खर्च मागणी क्रमांक के-७, २८५१-ग्रामोद्योग व लघु उद्योग, १०५, खादी व ग्रामोद्योग, (००)(०९) मधकेंद्र कार्यक्रम (२८५१ ५३२६) या लेखा शिर्षाखालील ३३-अर्थसहाय्य या उद्दिष्टांखालील उपलब्ध तरतूदीमधून करण्यात यावा.

**४.** सदर रक्कमेच्या आहरण व संवितरणाचे अधिकार विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई यांच्या कार्यालयातील लेखा अधिकारी यांना राहतील.

**५.** सदर शासन निर्णय वित्त विभाग शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम भाग-२, दि.१७ एप्रिल, २०१५ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८-भाग-१, उपविभाग-३, अनुक्रमांक ४ नियम क्रमांक २७(२)(अ) अन्वये प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार आणि "मधाचे गाव योजनेच्या" दि.२०/०२/२०२४ रोजीच्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार सक्षम स्तरावर घेण्यात आलेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे. तसेच नियोजन विभागाच्या सहमतीने त्यांचा ई-फाइल वरील Note # १६(अनौ.सं.क्र.१६४/२०२५)/का.१४१६, दि.०३/०४/२०२५ व वित्त विभागाच्या सहमतीने त्यांचा ई-फाइल वरील Note # २४/व्यय-१६, दि.२१/०४/२०२५अन्वये देण्यात आलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**६.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०२५०४३०१७४३१४४११० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by AJIT TUKARAM SASULKAR
Date: 2025.04.30 17:43:57 +05'30'

**(अजित सासुलकर)**
**शासनाचे उपसचिव**

**प्रत :-**

**माहितीसाठी व आवश्यक त्या उचित कार्यवाहीसाठी अग्रेषित**

१. विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई.
२. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ, मुंबई.
३. अर्थ सल्लागार व मुख्य लेखाधिकारी, महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ, मुंबई.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
८. वरिष्ठ उप महालेखापाल (पडताळणी) बाह्य लेखा परीक्षा विभाग, मुंबई.
९. लेखा अधिकारी, उद्योग संचालनालय, नवीन प्रशासन भवन, मुंबई. (५ प्रती)
१०. कार्यासन अधिकारी, वित्त विभाग (व्यय-१६/अर्थसंकल्प-१४/अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई-३२
११. कार्यासन अधिकारी (प्रशासन-१), उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. निवड नस्ती (उद्योग-६).

शासन निर्णय क्रमांक : केव्हीबी-२०२४/प्र.क्र.६४/उद्योग-६ दिनांक :- ३० एप्रिल, २०२५ सोबतचे

## परिशिष्ट

| **अ.क्र.** | **गावाचे नाव** | **मंजूर करण्यात आलेला निधी (रुपये लाखात)** |
|---|---|---|
| १. | घोलवड, ता.डहाणु जि.पालघर, | ५४ |
| २. | भंडारवाडी, ता.किनवट, जि.नांदेड | ५३ |
| ३. | बोरझर, ता.नवापुर, जि.नंदुरबार | ४८ |
| ४. | काकडदाभा, ता.औढ़ानागनाथ, जि.हिंगोली | ४९ |
| ५. | चाकोरे, ता.त्र्यंबकेश्वर, जि.नाशिक | ४०.२२ |
| ६. | उडदावणे, ता.अकोले, जि.अहिल्यानगर | ४६.७५ |
| ७. | शेलमोहा, ता.गंगाखेड, जि.परभणी | ५४ |
| ८. | सिंधीविहीर, ता.कारंजा, जि.वर्धा | ५४ |
| ९. | सालोशी, ता.महाबळेश्वर, जि.सातारा | ४९ |
| १०. | आमझरी, ता.अमरावती, जि.अमरावती | ५४ |
| | **एकूण** | **५०१.९७** |